

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२१५) श्री शिवनामावल्यष्टकम् १**

हे चन्द्रचूड मदनान्तक शूलपाणे
स्थाणो गिरीश गिरिजेश महेश शंभो ।
भूतेश भीतभयसूदन मामनाथं
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। १ ।।

भारतीय संस्कृतीमध्ये, उपासनेचा क्षेत्रामध्ये नामा ला प्रचंड महत्त्व आहे. सर्वच देवतांच्या सर्व पंथात, संप्रदायात नामस्मरण ही समान गोष्ट आहे. भगवंताच्या विविध  नामांमधून त्याच्या विविध गुणांचे वर्णन केलेले असते. स्वरूपाचे निर्देशन केलेले असते.

याच कारणाने नामस्मरणाचे हे महत्त्व लक्षात घेऊन भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराजांनी या स्तोत्रात भगवान शंकरांच्या विविध नामांची गुंफण केली आहे. त्यांचे अर्थ पाहणे देखील तेव्हाचा अनुभव असेल. पूज्यपाद आचार्य श्री म्हणतात,

हे चन्द्रचूड - ज्यांनी आपल्या चुडा म्हणजे केशकलापावर चंद्रकोर धारण केली आहे असे,

मदनान्तक - ज्यांनी आपल्या तृतीय नेत्रातील अग्नीने मदनाला भस्म केले असे,

शूलपाणे- शूल म्हणजे टोक. तीन टोके असल्यामुळे भगवंताच्या आयुधाला त्रिशूल म्हणतात. पाणि म्हणजे हात. ज्यांनी हातात त्रिशूळ घेतला आहे असे, तीनही गुणांचे संचालक.

स्थाणो -  परम स्थिर, अविचल,

गिरीश - गिरी म्हणजे पर्वत. त्या हिमालय पर्वतावर जे शयन करतात ते गिरीश.

गिरिजेश - त्या गिरी म्हणजे पर्वतापासून जन्माला आली ती गिरीजा. अर्थात देवी पार्वती. तिचे स्वामी.

महेश - सगळ्यात श्रेष्ठ देवता,

शंभो - सगळ्यांचे कल्याण करणारे,

भूतेश - सर्व प्राणिमात्रांचे स्वामी, नियंत्रक, संचालक.

भीतभयसूदन - भीत म्हणजे घाबरलेला . त्याच्या भीती चे कारण ते भय. त्या भयाला जे दूर करतात ते भीतभयसूदन.

मामनाथं

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - हे जगदीशा ! माझ्यासारख्या अनाथांचे या संसाराच्या गहन दुःखातून रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २१६) श्री शिवनामावल्यष्टकम् -२

हे पार्वतीहृदयवल्लभ - हे संबोधन मोठे मजेदार आहे. यातील हृदयवल्लभ शब्द पार्वतीसह वापरला तर पार्वती च्या हृदयाला अत्यंत प्रिय असणारे असा अर्थ होतो आणि पार्वती आणि हृदयवल्लभ हे शब्द वेगळे केले तर ज्यांच्या हृदयाला पार्वती अत्यंत प्रिय आहे असा अर्थ होतो. दोघांच्याही परस्पर प्रियतेचा विचार आचार्य एकाच शब्दात मांडतात.

चन्द्रमौले - ज्यांनी मस्तकावर चंद्र धारण केला आहे असे,

भूताधिप - भूत शब्दाचा अर्थ जे जे निर्माण झाले ते. या संपूर्ण चराचर विश्वाचे अधिपती.

प्रमथनाथ - प्रमथ म्हणजे घुसळून काढणारा. लक्ष्यार्थाने भगवान मदन. त्यांचे स्वामी.

गिरीशचाप - पर्वतराज हिमालयालाच धनुष्य करणारे. अर्थात बसल्या जागेवरूनच आपले कार्य करू शकणारे.

हे वामदेव - वाम म्हणजे सुंदर. सगळ्यात सुंदर देवता असा एक अर्थ.

वाम शब्दाचा दुसरा अर्थ आहे डावा. डावा हा शब्द गौण या अर्थाने वापरतात. जे आपल्या सौंदर्याने, शक्तीने, महात्म्याने, परम वैभवाने, सर्व देवतांना डावे करतात, गौण ठरवतात ते वामदेव

भव - निर्माण झालेल्या सर्व चराचर विश्वातील प्रत्येक पदार्थाच्या रूपात स्वतः प्रकट झालेले.

रुद्र - भगवान ब्रह्मदेवांच्या पुत्र रूपात घेतलेल्या अवतारात भगवान शंकर रडत प्रकट झाले. त्या रोदना मुळे त्यांना रुद्र असे म्हणतात.

पिनाकपाणे - भगवान शंकरांच्या धनुष्याला पिनाक असे नाव आहे.

पाणि शब्दाचा अर्थ आहे हात. (या शब्दात इकार ऱ्हस्व असतो. दीर्घ केला तर त्याचा अर्थ पाणी म्हणजे जल असा होतो.)

हातात पिनाक नावाचे धनुष्य धारण करणारे.

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - हे भगवान शंकरा ! माझे या गहन संसार दुःखातून रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २१७) श्री शिव नामावल्यष्टकम् -३

हे नीलकण्ठ वृषभध्वज पञ्चवक्त्र
लोकेश शेषवलय प्रमथेश शर्व ।
हे धूर्जटे पशुपते गिरिजापते मां
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। ३ ।।

भगवान शंकरांच्या या दिव्य नामावलीला पुढे सुरू ठेवताना जगद्गुरु आचार्यश्री म्हणतात,

हे नीलकण्ठ - समुद्रमंथनाच्या वेळी निघालेले हलाहल नामक महाभयानक विष, समस्त ब्रह्मांडाच्या कल्याणासाठी प्राशन केल्यामुळे ज्यांचा गळा काळानिळा पडलेला आहे असे.

वृषभध्वज - वृषभ हे धर्माचे प्रतीक आहे. भगवान शंकरांच्या ध्वजावर वृषभ काढलेला असतो. अर्थात ते जेथे असतात तेथे धर्म असतो. जेथे धर्म असतो तेथेच ते राहतात.

पञ्चवक्त्र - ज्यांना पाच मुखे आहेत असे,

चार दिशांना असणारी चार मुखे सर्वत्र घडणाऱ्या घटनांची जाणीव असणे याचे प्रतीक असतात. तर भगवान शंकरांचे पाचवे मस्तक हे बाहेरच्या चार दिशांना सोडून आत पाहणाऱ्या अंतर्ज्ञानाचे, आत्मज्ञानाचे प्रतीक असते.

लोकेश - लोक शब्द एक वचनात वापरला स्वर्ग,मृत्यु,पाताळ अशा लोकांचा द्योतक असतो. तर बहुवचनात वापरला तर त्याचे अर्थ सर्व लोक म्हणजे माणसे असा होतो. या सगळ्यांचे पालक.

शेषवलय - ज्यांच्या गळ्यात, हातात सर्पांनी गुंडाळी मारली आहे असे.

प्रमथेश- मनाचे चालक. त्यामध्ये सर्वाधिक मथन म्हणजे घुसळण चालते म्हणून मनाला प्रमथ असे म्हणतात.

शर्व - हा शब्द संस्कृत च्या शृ धातूपासून तयार झाला आहे. त्याचा अर्थ हिंसा करणे असा होतो. भक्तांच्या सकल दुःखांना नष्ट करणारे ते शर्व.

हे धूर्जटे - ज्यांनी मस्तकावर जटा धारण केल्या आहेत असे.

पशुपते - सकल जीवांचे संचालक,

गिरिजापते - देवी पार्वतीचे पती.

असणाऱ्या हे भगवान शंकरा !

मां-

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - या संसाराच्या गहन दुःखातून हे जगदीश्वरा ! मला सांभाळा. माझे रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२१८) श्री शिवनामावल्यष्टकम् - ४**

हे विश्वनाथ शिव शंकर देवदेव
गङ्गाधर प्रमथनायक नन्दिकेश ।
बाणेश्वरान्धकरिपो हर लोकनाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। ४ ।।

श्री शिवस्तुती कारक नामावली मध्ये जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज पुढे म्हणतात,

हे विश्वनाथ - विश्व शब्दाचा अर्थ आहे पसरलेले. या अनंत कोटी ब्रह्मांडाच्या पसाऱ्याचे स्वामी असल्यामुळे भगवंताला विश्वनाथ असे म्हणतात.

शिव - शिव शब्दाचा अर्थ पवित्र. कोणतेही पात्र किंवा त्यातील जल अपवित्र असू शकते. मात्र त्या अपवित्र जलात देखील पडलेले प्रतिबिंब शुद्धच असते. तसे सर्व जीव मात्रांच्या अंतरंगी परमशुद्ध चैतन्यरूपात भगवान क्रीडा करीत असल्याने त्यांना शिव असे म्हणतात. ते शिव चैतन्य देहापासून विलग झाले की देहाला म्हटले जाते.

शंकर - शम् म्हणजे कल्याण. सगळ्यांचे कल्याण करतात ते भगवान शंकर.

देवदेव- जेथे दिव्यत्व असते त्या स्वरूपाला देव असे म्हणतात. अशा सगळ्या देवांचेही देव.

गङ्गाधर - ज्यांनी आपल्या मस्तकावर गंगा धारण केली आहे असे.

प्रमथनायक - सगळ्या प्राणिमात्रांच्या मनाचे संचालक.

नन्दिकेश - नंदी हे एका आणि धर्माचे तर दुसऱ्या मनाचे प्रतीक आहे. या दोन्हींचे स्वामी.

बाणेश्वरान्धकरिपो - भगवान शंकरांनी आपल्या विनाशलीले मध्ये बाणासुर, अंधकासुर अशा विविध राक्षसांचा विनाश केला आहे. त्या कथांचा विचार करता त्यांचे रिपू म्हणजे शत्रू.

हर लोकनाथ

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - हे लोक नाथा ! माझे हे संसाररूपी गहन दुःख दूर कर. माझे रक्षण कर.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२१९) श्री शिव नामावल्यष्टकम् -५**

वाराणसीपुरपते मणिकर्णिकेश
वीरेश दक्षमखकाल विभो गणेश ।
सर्वज्ञ सर्वहृदयैकनिवास नाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। ५ ।।

भगवान शंकरांच्या आणखी काही नावांनी त्यांचे गुणगान करणारे आचार्यश्री म्हणतात,

वाराणसीपुरपते - वारणा आणि असी अशा दोन नद्यांच्या मध्ये असणाऱ्या क्षेत्राला वाराणसी असे म्हणतात. त्या श्री क्षेत्र काशी ची देवता आहे भगवान श्री विश्वनाथ.

मणिकर्णिकेश - काशीमध्ये वाहणाऱ्या देवी गंगेला मणिकर्णिका असे म्हणतात. त्या गंगेचे उपास्य स्थान असणारे ते मणिकर्णिकेश.

हा मनकर्णिका घाट काशी मधील सर्वात प्राचीन घाट म्हटला जातो. येथे काशीतील महान स्मशान आहे. येथील चितेचे भस्म श्री विश्वनाथाला समर्पित केले जाते. त्या स्मशानात निवास करणारे.

वीरेश - अद्वितीय पराक्रमी. दक्ष यज्ञाच्या विनाशासाठी वीरभद्र रूपामध्ये प्रकट झालेले.

दक्षमखकाल - दक्ष प्रजापती नामक प्रजापतीच्या राजाने केलेला मख म्हणजे यज्ञ, त्या यज्ञात भगवान शंकरांची प्रथम पत्नी, दक्षकन्या सतीने स्वतःला जाळून घेतल्यामुळे, भगवान शंकरांनी नष्ट केला. या कथेचा संदर्भ घेत या यज्ञाचा काळ अर्थात विनाशक. विभो - विभू शब्दाचा अर्थ आहे व्यापक.

गणेश - देवता रूपी सर्व गणांचे अधिपती.

सर्वज्ञ - भूत, भविष्य, वर्तमान अशा तीनही काळात घडणाऱ्या सर्व घटनांचे साक्षी. सर्वहृदयैकनिवास - सर्वांच्या हृदयामध्ये निवास करणारे, चालक चैतन्य.

नाथ - हे माझ्या स्वामी,

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - जगदीश्वरा ! या संसाररूपी गहन दुःखातून माझे रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२२०) श्री शिवनामावल्यष्टकम् -६**

श्रीमन् महेश्वर कृपामय भो दयालो
हे व्योमकेश शितिकण्ठ गणाधिनाथ ।
भस्माङ्गराग नृकपालकलापमाल
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥ ६ ॥

भगवान शंकरांच्या दिव्य वैभवाचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

श्रीमन् - श्री म्हणजे लक्ष्मी, वैभव. भगवान शंकरांचा निवास असणारा कैलास लोक ब्रह्मांडातील सर्वश्रेष्ठ वैभवसंपन्न स्थान म्हणून वर्णिला आहे. त्याने युक्त ते श्रीमान.

महेश्वर - सगळ्यात ईश्वरांचे देखील ईश्वर म्हणून महेश्वर.

कृपामय - भक्तांच्या बद्दल त्यांच्या मनात कृपेचा अपार सागर भरलेला आहे असे,

भो दयालो - अत्यंत दयापूर्ण रीतीने जे भक्तांच्या मनोकामना पूर्ण करतात.

हे व्योमकेश - व्योम म्हणजे आकाश. तेच ज्यांचे केस आहे असे. अर्थात परम व्यापक.

शितिकण्ठ - ज्यांच्या गळ्याच्या भोवताली सर्प गुंडाळलेला असल्यामुळे तो थंड झालेला आहे असे. गणाधिनाथ - नंदी, भृंगी,शृंगी, पुष्पदंत इ. समस्त शिवगणांचे स्वामी.

भस्माङ्गराग - सर्वांगावर विभूतीचे सौंदर्य धारण करणारे.

सामान्य पदार्थ जाळले तर त्याची राख होते पण यज्ञात समर्पित केलेल्या गोष्टींचे भस्म होते. साधकांच्या जीवन यज्ञाचे भस्म भगवान धारण करतात.

नृकपालकलापमाल - नृक म्हणजे मनुष्य. त्या सगळ्यांचे पालक ते नृकपालक. येथे हा शब्द भगवान ब्रह्मदेवां करिता वापरला आहे. त्या ब्रह्मदेवांनी सृष्टीच्या आरंभी ज्योतिर्लिंग स्वरूपात प्रगटलेल्या भगवान शंकरांचा आदी अंत मी जाणला असे असत्य कथन केले. ब्रह्मदेवांच्या मुळात पाच असणाऱ्या मस्तकां मधून

एक मस्तक, हे असत्य वचन निघाल्यामुळे श्रीशंकरांनी कापले असे पुराणात वर्णन आहे. त्या मस्तकाची माळ गळ्यात धारण करणारे.

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष- अशा हे भगवान महादेवा ! या गहन संसार रुपी दुःखातून माझे रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२२१) श्री शिव नामावल्यष्टकम् - ७**

कैलासशैलविनिवास वृषाकपे हे
मृत्युंजय त्रिनयन त्रिजगन्निवास ।
नारायणप्रिय मदापह शक्तिनाथ
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। ७ ।।

आपले रक्षण करण्याची प्रार्थना करताना भगवान आदि शंकराचार्य स्वामी महाराज पुढे म्हणतात,

कैलासशैलविनिवास - हिमालयातील कैलास पर्वतावर शैल म्हणजे शिखरावर विशेषत्वाने निवास करणारे. विशेषत्वाने म्हणण्याचे कारण तसे तर शिवतत्त्व संपूर्ण चराचर व्याप्त आहे. परंतु कैलासावर ते विशेषत्वाने निवास करीत असते त्यामुळे त्यांना आचार्यश्री कैलासशैलविनिवास अशा विशेष संबोधनाने आळवतात.

वृषाकपे - वृषा म्हणजे जीव. तर कपी शब्दाचा एक अर्थ आहे सूर्य. सर्व जीवांना सूर्याप्रमाणे ज्ञान, प्रकाश, ऊर्जा देतात ते वृषाकपी.

हे मृत्युंजय - मृत्यूवर विजय मिळवणारे, यांच्या कृपेने साधक मृत्यूवर विजय मिळवतात असे.

त्रिनयन - अंतर्ज्ञान प्रगट करणाऱ्या तिसऱ्या डोळ्याने युक्त.

त्रिजगन्निवास - स्वर्ग, मृत्यु ,पाताळ या तिन्ही लोकात निवास करणारे. तेथे निवास करणाऱ्या सर्व जीवांच्या अंतर्यामी असणारे चैतन्य.

नारायणप्रिय- भगवान श्रीविष्णूंना अत्यंत प्रिय असणारे असा एक अर्थ ,तर दुसरीकडे भगवान विष्णू ज्यांना अत्यंत प्रिय आहेत असे , अशा दोन्ही अर्थाने हा शब्द लागू पडतो.

मदापह - सकल दैत्य किंवा दुष्टांचा मद अर्थात शक्तीचा गर्व नष्ट करणारे, सर्वाधिक शक्ती संपन्न.

शक्तिनाथ - भगवती आदिशक्तीचे स्वामी.

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - हे जगदीश्वरा ! या गहन संसार दुःखातून माझे रक्षण करा.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**२२२) श्री शिवनामावल्यष्टकम् ८**

विश्वेश विश्वभवनाशक विश्वरूप
विश्वात्मक त्रिभुवनैकगुणाभिवेश ।
हे विश्वबन्धविनिवारण दीनबन्धो
संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ।। ८ ।।

भगवान विश्वनाथाच्या विश्वव्यापक वैभवाचे विशेष वर्णन करताना जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

विश्वेश - या संपूर्ण चराचर ब्रह्मांडाचे अधिपती, या विश्वात घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर अंतिम नियंत्रण ठेवणारी परमश्रेष्ठ शक्ती. विश्वभवनाशक - या विश्वात भव म्हणजे उत्पन्न झालेल्या प्रत्येक गोष्टीचा शेवटी विनाश करणारे. प्रणय स्वरुपात या सगळ्याचा विलय करणारे.

विश्वरूप - या विश्वातील प्रत्येक घटकाच्या रूपामध्ये स्वतः नटलेले. पृथ्वी आप तेज वायू व आकाश ही पंचमहाभूते तथा सूर्य, चंद्र आणि यजमान म्हणजे जीव या आठ रूपात नटलेल्या भगवान शंकरांना अष्टतनुधारी शिव असे म्हणतात. त्याचा येथे संदर्भ आहे. या सगळ्यात नटले असल्यामुळे ते विश्वव्यापक आहेत.

विश्वात्मक- सगळ्या विश्वाला व्यापून असलेले चैतन्य. त्रिभुवनैकगुणाभिवेश - संपूर्ण त्रैलोक्यातील सर्व सद्गुणांचे अधिष्ठान असलेले.

हे विश्वबन्धविनिवारण - आपल्याला शरण आलेल्या आपल्या भक्तांना या संसाररूपी बंधनातुन सोडविणारे.

दीनबन्धो - ज्याला अन्य कोणाचाही आधार उरलेला नाही त्याला शास्त्र दीन असे म्हणते. अशा समस्त दीनांचे आप्तस्वकीय होऊन त्यांचे कल्याण करणारे. त्यांच्या उन्नतीचा मार्ग प्रशस्त करणारे.

अशा हे भगवान शंकरा !

संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष - हे जगदिशा! या संसाररूपी गहन दुःखातून माझे रक्षण करा.